नगर विकास विभागाच्या आस्थापनेवरील सहायक संचालक, नगर रचना, गट-अ (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या मध्यावधी बदल्या/ प्रतिनियुक्ती बाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : बदली-५८२०/प्र.क्र.७४/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : १२ जून, २०२०.**

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन), कलम ४ (५) व नियम ६ मधील तरतुदींनुसार तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील परिशिष्ट-तीन, नियम ४० (१) (२) (३) (४) व परिशिष्ट-दोन मधील अटी व शर्तीनुसार खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार सहायक संचालक, नगर रचना संवर्गातील खालील अधिकाऱ्यांची मध्यावधी बदली करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव | सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाचे नाव | बदली/प्रतिनियुक्ती नंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.सुरेश द. निकुंभे | सहायक संचालक, नगर रचना, यो.क्र.१ व २ वि.घ. इचलकरंजी (रुजू नाहीत) | सहायक संचालक, नगर रचना, ठाणे |
| २. | श्री.मिलींद आवडे | सहायक संचालक, नगर रचना, मिरा-भाईंदर महानगरपालिका (प्र.नि.) | सहायक संचालक, नगर रचना, रत्नागिरी |

**०२.** या आदेशान्वये पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी बदली झालेल्या ठिकाणी तातडीने रुजू व्हावे व संबंधित अधिकारी बदली/प्रतिनियुक्ती झालेल्या पदावर रुजू झाल्याचा अहवाल संबंधित कार्यालय / संचालक, नगर रचना, पुणे यांनी nitin.shelke@nic.in या ई-मेल पत्त्यावर तात्काळ सादर करावा.

**०३.** सदरहू आदेशान्वये बदलीने पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास त्याची संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाबाबतची कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

०४. सहायक संचालक, नगर रचना, मिरा-भाईंदर महानगरपालिका या पदाचा अतिरिक्त कार्यभार पुढील आदेश होईपर्यंत श्री.दि.प्र.घेवारे, नगर रचनाकार, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचेकडे सोपविण्यात येत आहे.

०५. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२००६१२१३०१०३४६२५ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=e1feea176a1e6a273c574bb6f1a1edb58bf87424118bccd6ee07340581733b70, ou=AGRICULTURE AND ADF, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2020.06.12 14:35:28 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

संबंधित अधिकारी यांना,

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
९. आयुक्त, मिरा भाईंदर महानगरपालिका, जि.ठाणे.
१०. जिल्हाधिकारी, ठाणे/रत्नागिरी.
११. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. (३-प्रती)
१२. सर्व सह संचालक, नगर रचना.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/रत्नागिरी.
१४. सहायक संचालक, नगर रचना, यो.क्र.१ व २ वि.घ. इचलकरंजी, जि.कोल्हापूर
१५. सहायक संचालक, नगर रचना, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जि.ठाणे.
१६. सहायक संचालक, नगर रचना, रत्नागिरी.
१७. निवडनस्ती/नवि-२७.

***